**सहायक कक्ष अधिकारी सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा -२०१७ या परीक्षेला पुन्हा बसू इच्छित असलेल्या उमेदवारांचे (Repeater) अर्ज पाठविण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## सामान्य प्रशासन विभाग

**शासन परिपत्रक क्रमांकः सेप्रप-२०१७/प्र.क्र. ११/का.१७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक: ०१ जुलै, २०१७

**वाचा -**

१) शासन परिपत्रक क्रमांकः सेप्रप-२०१७/प्र.क्र.११/का.१७, दिनांक ०५ एप्रिल,२०१७.
२) शासन परिपत्रक क्रमांकः सेप्रप-२०१७/प्र.क्र.११/का.१७, दिनांक २२ मे,२०१७.

## शासन परिपत्रक -

सहायक कक्ष अधिकारी सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा-२०१७, या परीक्षेला प्रथमच बसणाऱ्या पात्र उमेदवारांचे विहित नमुन्यातील अर्ज समक्रमांकाच्या दि. ०५ एप्रिल, २०१७ च्या परिपत्रकान्वये मागविण्यात आले होते. तथापि, जे सहायक कक्ष अधिकारी यापूर्वी झालेल्या सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षेत अनुत्तीर्ण झाले आहेत किंवा परीक्षेला अनुपस्थित राहीले आहेत अशा उमेदवारांना सहायक कक्ष अधिकारी सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा-२०१७ ला बसावयाचे असल्यास त्यांचे विहित नमुन्यातील अर्ज आता या परिपत्रकान्वये मागविण्यात येत असून मंत्रालयाच्या इंट्रानेट वरील “आवेदन पत्र” या शिर्षाखाली अर्जाचा विहित नमुना उपलब्ध करुन देण्यात आला आहे.

२. तरी सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग आणि महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या आस्थापना अधिकाऱ्यांनी पात्र उमेदवाराच्या अर्जातील सर्व तपशिल बरोबर असल्याची खात्री करून प्रमाणित केलेले अर्ज या विभागाकडे निश्चितपणे दिनांक **२० जुलै, २०१७** पर्यंत पोच होतील अशा पध्दतीने पाठवावेत . अर्जामध्ये उमेदवाराचे संपूर्ण नाव नमूद केले असल्याची कृपया खात्री करावी.

३. सहायक कक्ष अधिकारी सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा-२०१७ च्या परीक्षेला प्रथमच बसण्यास पात्र असणाऱ्या ज्या उमेदवारांनी दि. ५ एप्रिल, २०१७ च्या परिपत्रकानुसार विहित मुदतीत अर्ज पाठविलेले आहेत त्या उमेदवारांसाठी प्रशिक्षण वर्ग समक्रमांकाच्या दि. २२ मे, २०१७ च्या परिपत्रकानुसार आयोजित करण्यात आले आहे. सदर परिपत्रकातील “परिशिष्ट अ ”मध्ये नमूद केलेल्या उमेदवारांव्यतिरिक्त जे सहायक कक्ष अधिकारी सेवाप्रवेशोत्तर प्रशिक्षण परीक्षा-२०१७ या परीक्षेला प्रथमच बसण्यास पात्र आहेत परंतू त्यांनी दि. ५ एप्रिल, २०१७ च्या परिपत्रकानुसार विहित मुदतीत अर्ज पाठविलेले नाहीत ते उमेदवारही आता विहित नमून्यात अर्ज सादर करु शकतात. अशा उमेदवारांचेही विहित नमून्यातील अर्ज प्रशासकीय विभागाच्या

आस्थापना अधिकाऱ्यांनी प्रमाणित करून पुन्हा परीक्षेला बसणाऱ्या उमेदवारांच्या (Repeater) अर्जासोबत या विभागाकडे दि. २० जुलै, २०१७ पर्यंत पाठवावेत.

४. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांनी सदर परिपत्रक संबंधित सहायक कक्ष अधिकारी यांच्या (प्रतिनियुक्ती वर / रजेवर असलेल्या सहायक कक्ष अधिकारी यांच्या सह) कृपया लेखी स्वरुपात त्वरीत निदर्शनास आणावे व त्यांची स्वाक्षरी घेऊन ती कागदपत्रे आपल्या अभिलेखात जतन करुन ठेवावीत. सहायक कक्ष अधिकारी पदावर नियमित नियुक्त झालेले उमेदवारच फक्त या परीक्षेला बसू शकतात याची सर्व प्रशासकीय विभागांनी नोंद घेवून वेळीच उचित कार्यवाही करावी. या संदर्भात काही त्रुटी राहील्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाच्या आस्थापना अधिकारी यांची राहील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०७०११५४१५०६७०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok D Bhawar

Digitally signed by Ashok D Bhawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=DESK OFFICER, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=889194f9dc0d33cf371e0c5894ba7eb11af93d7eb91047cde855f6cea48479ec, serialNumber=a5b971e0d66fa6d25553669ec4c46d80f1a7679479035f99c2d14d7244aad1f6, cn=Ashok D Bhawar
Date: 2017.07.01 16:23:36 +05'30'

**(अ. धों. भवार)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग (पत्राने),

२. आस्थापना अधिकारी,सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग,

३. निवडनस्ती.